# घर आ जा परदेसी तेरा देस बुलाये रे

ई - साहित्य प्रकाशन
वर्ष : दूसरे, अंक : १४
दिनांक : २६.०४.२०१०

## या अंकात वाचा..

- LONDON DREAMS
- देस परदेस
- परदेसी

**संपादक -**
स्वप्ना कोल्हे ( नाशिक )

**सहसंपादक -**
सोनाली घाटपांडे ( पुणे )
भारती सरमळकर ( मुंबई )
सचिन काकडे ( मुंबई )

**अतिथी संपादक -**
स्वप्ना जोशी ( लंडन )



हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी.. netaksharee@gmail.com

# LONDON DREAMS

## अतिथी संपादकाच्या लेखणीतून



जिवलगा,रहिले दूर घर माझे..पाऊल थकले..माथ्यावरती जड झाले ओझे..
आशा ताईंचा आर्त सूर कातरवेळी अजून उदास करुन जातो अन मग सय येते ती आपल्या मातीची.भारतापासून शेकडो मैल दूर UK मधल्या एका Northampton नामक छोट्या शहरात बसलेली मी मग हळूच डोळे बंद करुन मुंबईची सफर करुन येते.९.२० ची ट्रेन चुकू नये म्हणून धावपळ करणारी मुंबई,गटागटाने चिवचिवत शाळेला जाणारी मुंबई,खिडक्यांचे पडदे लावून क्षणभर दुपारी लवंडलेल्या गृहिणींची मुंबई,ऑफिसचे विचार डोक्यात घोळवत थकलेल्या पावलांनी घराकडे परतणारी मुंबई,तरुणाईच्या जोशाने भारताच्या अर्थव्यववस्थेला हातभार लावणारी कॉल सेंटरची रात्रीची मुंबई,गणेशोत्सवात तुफान नाचणारी बेधुंद मुंबई,डबेवाल्यांची मुंबई,कामवाल्या बाईंची मुंबई,बागेच्या आडोशातली मुंबई,फुटपाथवर निजलेली,माडीवर सजलेली,बाँब ब्लास्ट मध्ये थिजलेली,आधी घामात अन मग पावसात भिजलेली माझी मुंबई ! अन मग हळूच मन प्रश्न विचारतं,तू नक्की कुठली गं ?



चित्रपट सरकत जावा,तसा डोळ्यांपुढे आजवरचा प्रवास सरकत जातो.परदेशी जायची संधी चालून आली तेव्हा स्वतःलाच विचारुन पाहिलं,का जायचं आहे ? ईश्वर कृपेने भरपूर पगाराची नोकरी,चांगला हुद्दा वगैरे भारतात मिळालचं होतं.पण,डोक्यात झिंग होती ती स्वतःच्या कक्षा तपासून पाहण्याची, comfort zone मधून बाहेर पडून भारताकडे पाहण्याची नवीन दृष्टी हुडकण्याची.आणि,होय नाही करता UK ला येऊन पोहचले.



या देशात जगत असतांना मन नकळत दोन देशातील गुण दोषांची तुलना करत राहिलं.इथली व्यावसायिकता,वक्तशीरपणा,शिस्त तर बहुश्रुत आहेच पण ह्या सगळयात मनात घर करुन गेली ती यांची सामाजिक बांधिलकी.२००९ सालात बेरोजगारी आणि आर्थिक मंदीचे चटके सोसत असतांनाही अवघ्या ब्रिटनने ८० लक्ष पाऊंडाहूनही अधिक देणग्या केवळ एका दिवसात जागतिक समाज कार्याकरता उभारल्या.यातील काही गंगाजळी भारताच्या वाट्याला देखील आली.( त्याचा वापर योग्य प्रकारे झाला असेल का ? हा विचार मनात आल्याशिवाय राहत नाही. )

एक स्त्री म्हणून इथे वावरतांना खुप मोकळा श्वास घेता येतो.संध्याकाळच्या गर्दीतही ट्युब ट्रेनच्या दाटीवाटीत स्त्रीला वावगा स्पर्श करण्यासाठी आसुसलेले लोचट हात नाहीत की विचकट शेरे नाहीत.आपल्या आधी दुसऱ्याला प्राधान्य देणारी इकडची संस्कृती.मग सुपरमार्केट मध्ये रांग लावायची असो किंवा बस,ट्रेन मध्ये जागा पकडायची असो.. 'पहले आप'करुन ब्रिटीश लोक मान तुकवून देतात.



दुसऱ्याचा विचार करायची ही प्रवृत्ती केवळ इथेच थांबत नाही.समोरच्या व्यक्तीच्या वेळेचा आदर करण्याची ब्रिटीशांची सवय आपण शिकण्यासारखी आहे.२ वाजता येतो सांगून २.३० वाजता उगवायची इथे सोय नाही.ट्रेन जर चुकून २ स्टेशनच्या मध्ये थांबली तर वेळेचा अपव्यय केल्याबद्दल मोटरमन प्रवाशांची अनेकदा माफी मागतो. Northampton ला प्रवास करत असतांना गाडी ३० मिनीटे उशीरा आली म्हणून मी दिरंगाई अर्ज भरला.२ दिवसांनी घरी तिकीटाचे अर्धे पैसे वाऊचरच्या स्वरुपात परत आले.

( खरं सांगते तेव्हा माझं भारतीय मन अगदी गदगदून आलं. )

परदेशात राहत असतांना आपल्या भारतीयत्वाची भावना अधिक प्रबळ होते.एखाद्या NRI नावाचं कौतुक झालं तर अगदी आपलंच कौतुक झाल्यासारखं वाटतं.प्रा.अमर्त्य सेन,लेखक दीपक चोप्रा,दिग्दर्शक मनोज नाईट श्यामलन व मीरा नायर,गुरिंदर चढ्ढा,डॉ.मीना प्रभू,उद्योगपती लक्ष्मी मित्तल,हिंदुजा बंधू अशी कितीतरी नावं परदेशात भारताला सन्मान प्राप्त करुन देताहेत.एक गोष्ट आवर्जून नमूद करावीशी वाटते,ती म्हणजे हिंदी चित्रपटांमधला परदेस इथल्या वास्तवापासून खुप वेगळा आहे.उदा.द्यायचे झाले तर DDLJ या चित्रपटातील परदेशातील प्रत्येक व्यक्ती अस्खलित हिंदीतून बोलते ? लंडनमध्ये वाढलेल्या काजोलचे English Accent इंडियन कसे ?तिला हिंदी केवळ बोलताच येत नाही पण लिहता देखील येतं ?(आठवा काजोलची ती कविता जी फरिदा जलाल मिटक्या मारत वाचते),Beer मिळवण्यासाठी २४/७ उघड्या असणाऱ्या Tesco त जाण्याऐवजी शाहरुख अमरीश पुरीच्या छोट्या off licence दुकानात का कडमडतो ?असे भाबडे प्रश्न मनाला पडल्याशिवाय राहत नाही.

पण ह्या गोंडस मेक अप आड लपलेला आहे इथल्या समस्यांचा एक भेसूर चेहरा.मानवी नात्यांची झालेली फरफट,त्यातून उद्‌भवलेले अल्पवयीन मातांचे प्रश्नं,वाढत्या बेकारीमुळे फोफावत चाललेले गुन्हेगारीचे साम्राज्य,सख्ख्या किंवा सावत्र आई बापाच्या हिंसेचे,अत्याचाराचे बळी पडणारे शैशव,क्षणभंगुर आयुष्य भरभरुन जगण्याच्या हव्यासापोटी weekends ला पबच्या दारात स्वतःच्याच देहधर्मात लोळणारं तारुण्य,गोऱ्या कातडीच्या मनात लपलेला आणि outsourcing मुळे वाढतंच चाललेला छुपा वर्णद्वेष या आणि अशाच कितीतरी समस्यांचा या समाजाला शाप आहे.

स्वेच्छेने त्रिशंकू झालेल्या आमच्यासारख्या NRI च्या समस्या अजूनच निराळ्या! कल परसोमें बिते बरसों झालेल्या आम्हांला लोणच्यासारखं इथे पूर्णतः मुरता येत नाही आणि भारतात परतल्यानंतर बदललेल्या स्वतःला पुन्हा आपल्या माणसांत रुजता येत नाही.भारतात परतल्यावर आमच्याकडे पाहण्याचा सगळयांचाच दृष्टिकोण अगदी बदलून गेलेला असतो. NRI ची मतं,नवीन संकल्पना,भारताबद्दलचे आमचे विचार अग्राह्य किंवा चुकीचे मानले जातात.आम्हांला 'इथलं' काही कळत नाही किंवा आम्ही केवळ स्वार्थासाठीच परत येतो असा समज अजूनही तीव्र आहे.याव्यतिरिक्त भारतात नोकरी घेतांना आतापर्यंत अंगवळणी पडलेली व्यावसायिकता हीच मोठी समस्या बनून जाते आणि मग पदरी पडतं ते नैराश्य ! Non Resident Indian पासून सुरु झालेला प्रवास Non Required Indian पर्यंत येऊन थांबतो.

म्हणूनच की काय,या चिमण्यांनो परत फिरा रे ची साद ऐकून घरट्यात परत आलेली NRI मंडळी पुन्हा परदेशी निघून येतात.इतर परदेशस्थ भारतीयांबरोबर एकत्र येऊन परदेशात स्वतःचा एक भारत वसवतात.नेटाक्षरी,काव्यांजली परिवारापाशी आपलं मन मोकळं करतात.पुढच्या पिढीला राम कृष्ण कळावा म्हणून सगळे सण साजरे करतात,त्यांना जन गण मन आणि वंदे मातरम आवर्जून शिकवतात.पूर्वजांकडून मिळालेलं सहनशीलता,अतिथीभाव यासारखं स्थायीभावाचं संचित त्यांना सोपवून देतात आणि भारताशी नाळ तुटल्याचं शल्यं मनाच्या चोरकप्प्यात बंद करुन कधीतरी भारताच्या मातीत मिसळण्याचं स्वप्नं पापण्यांमध्ये जपून ठेवतात.

## अतिथी संपादकाची ओळख -



मी स्वप्ना प्रशांत जोशी.मानसशास्त्रातून M.A. पूर्ण झाल्यावर मी वेलिंगकर इन्स्टिट्युट मधून Management केलं.व्यावसायिक क्षेत्रात Sitel, 3G, Intelenet, ABN AMRO आणि Deutsche Bank अशा अनेक नामांकित organisations मध्ये नोकरी करायची संधी प्राप्त झाली.२००७ साली यु.के ला जायचा योग आला तेव्हा पुन्हा शून्यातून सुरुवात केली.सध्या मी Barclaycard या Barclays बँकेशी संलग्न कंपनीत Governance Risk Partner म्हणून पदभार सांभाळत आहे.

कविता लिखाणाची सुरुवात चौथीत असतांना झाली.मन जेव्हा जेव्हा साद देतं तेव्हा तेव्हा डोक्यात ओळी उमटायला लागतात आणि कागदावर उतरतात ( कधी कधी मी लिहायचा कंटाळाही करते ).ठरवून लिहायला जमत नसल्याने माझ्या लिखाणात सातत्य नाही.मी माझ्या कविता कधीही कुठे प्रकाशित केल्या नव्हत्या.पण orkut वरील काव्यांजली परिवाराची सदस्य झाल्यानंतर मात्र मला स्वतःला व्यक्त करण्याचा धीर आला आणि माझा लैखिक अत्याचार सर्वांनी गोड मानून घेतल्यावर माझा हुरूप वाढला.

वैयक्तिक जीवनात प्रशांत सारख्या मनाजोगत्या साथीदाराबरोबर ५ वर्षांपासून सुखनैव संसार करत असून ४ महिन्यांपूर्वीच आमच्या आयुष्यात रिया नामक चिमुकल्या परीने पदार्पण केलं आहे.ही नवीन जबाबदारी पेलण्यासाठी तुमच्या शुभेच्छा असतीलंच अशी आशा करते.जगभरात विखुरलेल्या मराठी माणसाला शब्दांनी जोडणाऱ्या नेटाक्षरीस माझ्या मनःपूर्वक शुभेच्छा.

# ....अल्फांसो....

अल्फांसो..हापूस आंबा
इंग्रजांच्या देशात
चक्क पिवळा धम्मक,कोकणातला हापूस आंबा मिळाला
विश्वासच बसत नव्हता डोळ्यांवर
चार वेळा चेक केला,मुंबईहून इंपोर्ट केलेला होता
एकदम..आनंदी आनंद गडे
        गेले पाच उन्हाळे इथेच गेल्याने
        आंबे कायमच मिस्स करत होतो
आंब्याचा वास घेतला,मन भरेपर्यंत
रस खायला पण धम्माल आली
माझ्या पोरीला आंब्याची कोय चोखायला शिकवलं
कित्ती वर्षांनी इतकी मज्जा
        आंब्याची चव मस्तं जिभेवर रेंगाळत होती
        कित्ती मिस करत होतो आंबा आणि अशा बऱ्याच गोष्टी
कित्तीतरी छोट्या छोट्या गोष्टींसाठी वाटतं
आता परत जावं भारतात
अशा एक एक मिस होणाऱ्या गोष्टींतून
आठवणीच्या धाग्यातून परतीचे दोर विणत असतो
        आज इथे आंबा मिळाला आणि त्या दोरातला एक धागा तुटला
    मघाशी गोड लागलेला आंबा आता तितकासा गोड वाटत नव्हता

- आकाश बिरारी
Leeds,UK



# ....आपली माती....

कितीही दूर असली तरी
एक माती आपली आहे
परक्या देशात फिरतांना ही
मनाशी जी जपली आहे
मुंबई लोकलचा गाणारा ग्रुप
इथे काही दिसत नाही
एकाच ट्रेनने रोज गेलो तरी
इथे समोरचा हसत नाही
रस्त्यावरची पाव भाजी
इथे काही मिळत नाही
Tissue मध्ये गुंडाळलेल्या
Burger ची चव कळत नाही
इकडच्या गल्ल्या मोठ्या तरी
क्रिकेट काही रंगत नाही
पार्क मध्ये फिरणारं बाल्यं
फुलांमध्ये दंगत नाही
इकडचा कावळा केविलवाणा
खिडकीवर वर्दी देत नाही
कारण इथे फोन केल्याशिवाय
पाहुणा सुध्दा येत नाही
जीर्ण होऊन गळलेले संस्कार
मन आता वेचत आहे
आपल्या मातीची सय आता
मला तिथे खेचत आहे

- स्वप्ना प्रशांत जोशी
NORTHAMPTON , UK



# ....अधांतरी....

Visa stamping झाल्यावर एकच धावपळ उडाली
जे स्वप्नात पाहिलं होतं ते वास्तवात येता उगीच भिती वाटू लागली
भेटी गाठी झाल्या,खरेदी झाली,सत्कार झाले,बॅगही भरली
ही सगळी गडबड लग्नाच्याही वर झाली
घरातून पाय काढायच्या वेळी लक्षात आलं
आजीशी थोडंसं बोलायचं राहून गेलं
स्वप्नांची दुनिया बाहेर होती,आपुलकीची छाया घरातच होती
काहीतरी मिळवण्यासाठी हे एवढे सगळे सोडायचं
आता या घरासमोरच्या अंगणात आम्ही पुन्हा कधी खेळायचं ?
आज अश्रूंचं वजन स्वप्नांपेक्षाही जास्तं झालंय
नकोच ही America असं हज्जारदा वाटून गेलं

विमान तळावर मित्रं मैत्रिणींची गर्दी झाली होती
कधी नव्हे ती अंगाऱ्याची पुडी मी खिशात ठेवली होती
हसत होतो,बोलत होतो,सगळ्यांचा निरोप मी घेत होतो
पाठ फिरवण्याची वेळ आली
बाबांची पापणी हलकेच गलबलली,बरेच काही बोलून गेली
सातासमुद्रा पलीकडे निघालायेस
समृध्दीच्या राज्यात निघालायेस
यशाची नवनवी शिखरे चढतांना इकडची काळजी करु नकोस
पण पत्र लिहायला मात्रं विसरु नकोस
एका डोळ्यात कौतुक आणि दुसऱ्या डोळ्यात काळजी
तुझी खुप आठवण येईल रे दिवाळीच्या सकाळी
व्यावसायिकतेच्या दुनियेत मनातला ओलावाही जप
जसा आहेस जातांना,परत येतांनाही तसाच अस
पाश्चात्य संस्कृतीत झालास जरी दंग,तोल नको सोडू
विमानात मिळेल सगळे पण
डाव्या बाजूच्या कोपऱ्यात लाडू ठेवलेत बांधून,ते नको विसरु

मित्रं विचारतात,मी काय miss करतो ?
कसं सांगू मी काय miss करतो ?
शाळेत फायनलला पहिल्या बॉलवर आउट झालो होतो
गणपतीच्या मांडवात मुद्दाम भांडलो होतो
फायनल इयरच्या पार्टित खुप रमलो होतो
आईच्या हातचे कधी मनसोक्त जेवलो होतो
कसं सांगू मी काय miss करतो ?

इथली संपन्नता पाहून तोंडात बोटे जातात
मात्र समृध्दीच्या देशातील लोकदेखील समाधानच शोधतात
इथल्या इंग्रजाळलेल्या पंजाबी गुजराथी पोरांना पाहून डोक्यात सणक भरते
पण मराठी मंडळीत देखील इंग्रजी बोलणाऱ्यांची अक्षरशः कीव येते
मित्रत्वाने वागवतात पण मित्रं कधीच नसतात
इथल्या सर्व गणितांची उत्तरे शेवटी शून्यच येतात
म्हणूनच वाटतं,देऊन टाकावे जिंकलेले सर्व काही
रहावे परत आपल्याच देशात बाबांच्या संगतीत
राजाभाऊची भेळ खावी,फडतरेची मिसळ चापावी
रंकाळ्यावर उगीच इकडून तिकडे चक्कर मारावी
राजाबळाचं पान खाऊन कोल्हापुरी शिवी प्रेमाने द्यावी
त्याची उधारी राहिलीच की द्यायची

परकं आभाळ जिंकण्यासाठी जमीन आम्ही सोडली
इथूनही आभाळ दिसतंय तेवढच उंच
पण आता तर पायाखाली जमीनही नाही उरली
कावळा राहिलो ना हंस,झालो आम्ही अधांतरी
झालो आम्ही अधांतरी

- मंदार काळे

# ....NRI....

एकवेळ अशी येते की आकाशाचं होतं छप्पर आणि पाय रोवून जिथे उभे असतो तेच घर
आपणच होतो आपले जिवलग , नेटाने धरुन ठेवतो चार भिंती
संध्याकाळ होते आणि आपल्या झाडाकडे उडावसं वाटतं
पण तिथे जर कुणी नसेल आता आपली वाट बघत ?
बसल्या फांदीवर रात्रं निघून जाते , एक गेली तशा बाकीच्या जातील
पण पसरुन बसलेलं असतं कुणी तिकडे जुने अल्बम्स
कुरवाळत आपल्या गिनतीतही नसलेली बक्षिसं,सर्टिफिकेटस
आणि तिकडेही सरते रात्र ,आवरता आवरता आठवणींचे पसारे
नाही म्हणायला रोजच गप्पा होतात,विचारपूसही जेवण खाण्याची
पण पोट भरत नाही,हे काय सांगितलं नाही तरी कळत नाही ?
जमवतो रोजचं आणि सणासुदीचं सारं , हं हाताची चव थोडीशी कमी पडते
बेसावध हळव्या क्षणी ऐकायची असते,दूरुन एक कातर हाक
ज्यानंतरच्या कल्लोळात कुठल्याच व्यवहारांना सापडू नये आपली वाट
पण गळ्याशी दाटलेलं दूर सारुन हसायची त्यांचीही सवय हुकूमी असते
सुरुवातीचं नाटक असतं,गोडच गोड,छान छान,मज्जाच मज्जा
चार दिवसांनी खरंही वाटायला लागतं , भूमिकेत शिरता शिरता
आजूबाजूला सापडतात नवी नाती नवे सोबती आणि नव्या नवलाईची नवी घरटी आकारतात
आपल्याला वाटतं आता वाट विसरलो अन ते वाट बघायला
जबाबदाऱ्यांच्या अदृश्य शृंखला आपणच हौसेने मिरवलेल्या
इकडे मुसमुसतं झाड तिकडे वेडं पाखरु , आयुष्य नावाचं पाणी मधल्यामध्ये वाहून जातं
आकाशाची स्वप्नं अशीच बरसत राहतात
त्यात मातीचे अश्रू बेमालूम मिसळतात आणि बघणाऱ्यांना येतो फक्तं यशाचा सुगंध
अशा वेड्या पाखरांची मंडळं होतात,संमेलनं आणि विरही झाडांचे ज्येष्ठ नागरिक संघ नी कट्टे
आम्हाला काय ? दोन्हींकडून निमंत्रण आणि टाळ्या !



- अनुश्री वर्तक,मुंबई

# ....चल पुन्हा अपुल्या देशी....

चल पुन्हा अपुल्या देशी , चल पुन्हा अपुल्या देशी
वाट पहातो रस्ता जिथला , तशाच जिथल्या वेशी
चल पुन्हा अपुल्या देशी , चल पुन्हा अपुल्या देशी

वाट पहाते सकाळ तिथली तुझी चहाला
काम थांबते जरा,सांग रे सांग कशाला
क्षणोक्षणी तव भास वाहती येत्या वाऱ्यासरशी
चल पुन्हा अपुल्या देशी , चल पुन्हा अपुल्या देशी

हरेक श्वासावरी काढिते दृष्ट माऊली
मिळते तुजला तिच्या प्रार्थनांचीच साऊली
चाहूल लागता तुझी धावते ती रे दारापाशी
चल पुन्हा अपुल्या देशी , चल पुन्हा अपुल्या देशी

तिथे न तू पण तिथेच तू रे त्यांच्यासाठी
इथेच तू पण इथे न तू रे तुझ्याहीसाठी
क्षणात कितीदातरी मनाने जिकडे जाशी
चल पुन्हा अपुल्या देशी , चल पुन्हा अपुल्या देशी

करशील साऱ्या पूर्ण अपेक्षा त्यांच्या आशा
जाशील ही तू अजून दूरच्या परक्या देशा
पण मातीसुध्दा जिथली तुजला वैभवराशी
चल पुन्हा अपुल्या देशी , चल पुन्हा अपुल्या देशी

- चैतन्य दिक्षीत



# ....मी इथे का ?....

B1 वरच्या प्रवासात H1 ची स्वप्ने दिसू लागतात
सेव्हिंगकडे डोळे आणि इन्श्युरन्स कडे कान असतात
H1 आला की ढगांवरुन प्रवास आपला चालू होतो
इंडियातल्या कंपनीमधला बॉस मग कार्टुन वाटू लागतो
कंसल्टन्सीच्या जॉबमध्येही वाटतं आपण हायटेक घर घेऊ
स्वारगेटच्या त्या ट्रॅफिकपेक्षा न्यू जर्सीमधले वेटींग बरे
हॉटेलात जेवून आणि ओव्हरटाईम टाकून तब्येतीचे बारा वाजतात
आपला मुलगा अमेरिकेत म्हणून घरचे मात्र खुश असतात
करो ना सेव्ह इट आणि कॅन बी चा शोध लवकरच चालू होतो
हॉटेलात टीप टाकतांना हात उगाच जड होतो
लुंगी अन मद्राशांना पाहून मनात उगाचच चीड येते
महाराष्ट्र मंडळाच्या कार्यक्रमांना न चुकता हजेरी लावली जाते
इंडियात जातांना शॉपिंगची भीती मनात बसलेली असते
Smirnoff किंवा Bacardi मात्र न चुकता बॅगेत पडते
इंडियामधून परत आल्यावर मन भकास,खिन्न होते
मी इथे का ? ह्या गणिताचे शून्याहूनही कमी उत्तर येते
It’s not worth it यारं
आपण झोपतांना विचार करतो
पहाटेचा घड्याळाचा गजर मात्र हळूच लावतो
दोन देशात आणि दोन लोकांत मनाचे हेलावे चालू राहतात
अमेरिकेतल्या फ्री वे वरती किशोरची गाणी वाजत राहतात
अमेरिकेतल्या फ्री वे वरती किशोरची गाणी वाजत राहतात



- अनामिक

# ....सोन्याचा पिंजरा....

एकच विचार डोक्यात भिनत होता , रात्रीच्या स्वप्नातही तोच किरकिरत होता
        ठरवलं तेव्हा आता यश मिळेपर्यंत झगडायचं , डिप्रेशनला आजच्या उद्याचा कॉन्फिडंस बनवायचं
कॉन्फिडंसचा त्या अखेरीस विजय झाला , ऑफर लेटर घेऊन एक दिवस माझाही आला
        आईने स्वतः वाचण्याआधी ते ठेवले समोर देवाच्या आणि म्हणाली,कष्टाचे चीज झाले माझ्या लेकराच्या
मग आप्तेष्टांना फोन झाले , गोड बातमी सांगायला
पेढे झाले,पार्टी झाली आनंद साजरा करायला
        त्यानंतर चातकासारखी जॉइनिंगची वाट बघत होतो
        स्टुडंट मधून प्रोफेशनल व्हायला उतावळा झाला होतो
आला तो उड्डाणाचा दिवस नव्या प्रवासाच्या आकाशात
नव्या आकांक्षा नव्या क्षितींजासह होतो नव्या उत्साहात
        गोड वेलकमने झाली सुरुवात नव्या गड्यांच्या क्यू मध्ये
        प्रथमदर्शनी सर्व छान वाटले
या नव्या वाटेमध्ये इंटरव्ह्यूचा पाहुणा म्हणून जी कॉफी प्याली तीच कॉफी आता इथे रोज हक्काची झाली
        तो कप शेअर करायला टेबलसमोर कुणी नव्हते
        फ्रेंडली इनव्हायरमेंट असले तरी मित्र सगळे दूर गेले होते
ओपन कल्चर असले तरी आता मोकळे कुणीही राहिले नव्हते
एसी मध्ये बसतांना पारावरच्या गप्पांच्या रंग उडाले होते
        आता उरले फक्त फोन आणि आई बाबांचे बोलणे
        लवकरच लक्षात आले आता शक्य नाही मागे परत परत फिरणे
थोडे साधे होते आधीचे दिवस होते पण नक्की आनंदी
खडतर असतील कदाचित पण होते ते स्वच्छंदी
        सुख मिळवण्यासाठी पैसा लागतो कमवायला का पैसा मिळवण्यासाठी सुख लागते गमवायला
ह्या प्रश्नाचे उत्तर हवे ज्याचे त्याने शोधायला
का प्रत्येकालाच लागते कधीतरी ह्या सोन्याच्या पिंजऱ्यात यायला ?



- अनामिक

# ....सागरा प्राण तळमळला....

ने मजसी ने परत मातृभूमीला सागरा प्राण तळमळला....
भूमातेच्या चरणतला तुज धूता मी नित्य पाहिला होता
मज वदलासी अन्य देशी चल जाऊ सृष्टीची विविधता पाहू
ते जननीहृद विरहशंकितही झाले परि तुवां वचन तिज दिधले
मार्गज्ञ स्वये मीच पृष्ठि वाहीन त्वरित या परत आणीन
विश्वसलो या तव वचनी मी जगदनुभवयोगे बनूनी मी
तव अधिक शक्ती उध्दरणी मी येईन त्वरे कथुनी सोडिले तिजला
सागरा प्राण तळमळला....

शुक पंजरि वा हरीण शिरावा पाशी ही फसगत झाली तैशी
भूविरह कसा सतत साहू या पुढती दशदिशा तमोमय होती
गुणसुमने मी वेचियली या भावे की तिने सुगंधा घ्यावे
जरि उध्दरणी व्यय न तिच्या तो साचा हा व्यर्थ भार विद्येचा
ती आम्रवृक्षवत्सलता रे नवकुसुमयुता त्या सुलता रे
तो बाल गुलाबही आता रे फुलबाग मला हाय पारखा झाला
सागरा प्राण तळमळला....

नभी नक्षत्रे बहुत एक परि प्यारा मज भरतभूमीचा तारा
प्रासाद इथे भव्य परी मज भारी आईची झोपडी प्यारी
तिजवीण नको राज्य मज प्रिया साचा वनवास तिच्या जरि वनिचा
भुलविणे व्यर्थ हे आता रे बहु जिवलग गमते चित्ता रे
तुज सरित्पते जी सरिता रे त्वदविरहाची शपथ घालितो तुजला
सागरा प्राण तळमळला....

या फेनमिषें हससि निर्दया कैसा का वचन भंगिसी ऐसा
त्वत्स्वामित्वा सांप्रत जी मिरवीते भिनी का आंग्लभूमीते
मन्मातेला अबला म्हणूनी फसवीसी मज विवासनाते देशी
तरि आंग्लभूमी भयभीता रे अबला न माझी ही माता रे
कथिल हे अगस्तिस आता रे जो आचमनी एक क्षणी तुज प्याला
सागरा प्राण तळमळला....



- स्वातंत्र्यवीर विनायक दामोदर सावरकर

# परदेसी - संपादकीय

NRI शब्दाभोवती एक गूढ़ असं वलय आहे.कुतूहुल,आकर्षण,आदर,त्याग अशा अनेक रंगछटांनी बनलेलं.समज-गैरसमजांनी गढूळलेलं.त्यामुळेच चित्रपट ह्या समाजमनाचा आरसा असणाऱ्या माध्यमाने आजपर्यंत अनेक चित्रपटांतून अनिवासी भारतीयांचे जीवन,त्यांच्या समस्या,त्यांची परिस्थिती हे सारं दाखवले आहे आणि तरीही खुप सारं व्यक्त करायचं,सांगायचं राहुन जातंच.म्हणूनच,संवेदनशील मूक मनांची भाषा असणाऱ्या नेटाक्षरीचा NRI मनांच्या भावना,जाणीवा,व्यथा व्यक्त करण्याचा हा प्रामाणिक प्रयत्न.

'स्थलांतर'ही मानवी कृती आदिम काळापासून सुरु झालेली.योग्य जमिनीच्या,शिकारीच्या शोधात मानव प्रगतीचा,विकासाचा एकेक टप्पा गाठत गेलाय.त्याचंच आधुनिक रुप म्हणजे 'परदेश गमन'.असं म्हटलं तरी वावगं ठरणार नाही.शिक्षण,नोकरी-व्यापाराची उत्तम संधी अशा नानाविध कारणाने आज मराठी माणूस जगाच्या कानाकोपऱ्यात जाऊन स्थिरावलाय.यश,पैसा,वैभव सारं मिळतंय पण कुठेतरी काहीतरी गमावल्याचीही खंत त्याच्या मनाला आहे.ही खंत आहे..'आपल्या' माणसांपासून दुरावल्याची नव्हे तर दूर आल्याची आणि ते साहजिकच आहे कारण एका ठिकाणचं जमिनीत रुजलेलं रोपटं उपटून दुसऱ्या ठिकाणी लावलं तर ते रुजतंच असं नाही.वैसे,कुछ पाने के लिये कुछ खोना तो पडताही है , है ना यार !

NRI व्यक्तीच्या स्वतःच्या अपेक्षा,त्याच्या कुटूंबियांच्या त्याच्याविषयी असणाऱ्या भावना तसेच समाजाचा त्याच्याविषयी असणारा दृष्टीकोण ,मतं ह्यात अनेकदा भिन्न विचार प्रवाह आढळून येतात.एखादी व्यक्ती परदेशात गेली म्हणजे तिथे ती अमाप सुख आणि पैशात लोळणारच असा एक गैरसमज सर्वसाधारणपणे आढळून येतो पण परदेशातलं एकटेपण,कामानिमित्ताने करावी लागणारी मेहनत,९/११ नंतर उद्‌भवलेल्या परिस्थितीने निर्माण केलेली दहशत,तिथे भारतीय विद्यार्थी तसेच नागरिकांवर,दुकानांवर होणारे हल्ले ह्या गोष्टी खुप गंभीर आहेत.कुटूंबातला तरुण मुलगा जर शिक्षण,नोकरी निमित्ताने परदेशात असेल तर त्याच्यामागे भारतात एकटं जीवन जगणाऱ्या आई-वडिलांची परिस्थिती ही नक्कीच NRI व्यक्तींच्या चिंतेचा विषय असते.अनेकदा असे होते की,मुलं आई वडिलांना देखील परदेशात राहायला घेऊन जाऊ इच्छितात पण सर्व आयुष्य भारतात घालवल्यावर उतारवयात परदेशी जाणे त्यांना रुचत नाही त्यामुळे ते भारतातच राहण्याचा निर्णय घेतात.अशात पुणे,दिल्ली सारख्या शहरांत अशा एकट्या राहणाऱ्या वयोवृध्द लोकांचे दिवसाढवळ्या राहत्या घरात होणारे खून आणि त्यानिमित्ताने होणाऱ्या 'परदेशी जावे की जाऊ नये' ह्या विषयावरच्या चर्चा हे नेहमीचेच झाले आहे.पण,अनेक कुटूंबिय ज्यांच्या घरातले कर्ते पुरुष परदेशी आहेत असे दोस्त,नातेवाईक ह्यांच्या आधाराने व्यवस्थित,सुरक्षित जीवन जगतही आहेत.मुलांच्या परदेशातल्या प्रगतीतच आपले सुख मानत आहेत आणि प्रसंगी मुलांनाही धीर,प्रोत्साहन देत आहेत.

ह्या सर्व गोष्टींचा,समस्यांचा मोठ्या धीराने सामना करत आज मराठी माणूस परदेशातही आपलं असं एक खास स्थान सर्व क्षेत्रांत टिकवून आहे.आठवणींचे तांडे तर येणारच,मन हळवे होणारच पण भावनेपेक्षा कर्तव्य श्रेष्ठ असते हेही विसरुन चालत नाही ना....अमेरिकेत असो नाही तर लंडनमध्ये..मराठी माणूस मराठी साहित्य संमेलनं,महाराष्ट्र मंडळं,ऑर्कुट कम्युनिटीज अशा विविध माध्यमातून एकजुट होत आहे.मराठी नाटकं,चित्रपट ह्यांना आवर्जून हजेरी लावत आहे.सारे सण,समारंभ साजरे करुन आपल्या घराचे मराठीपण,संस्कार परदेशातही टिकवून ठेवण्यासाठी धडपडत आहे.दूर असूनही दरी मात्रं येऊ नये यासाठी आटोकाट प्रयत्न करीत आहे.अर्थात प्रत्येक गोष्टीला अपवाद असतात तसंच ह्यालाही असतीलच..असो.



पण,यातूनही काही NRI परदेशातल्या त्यांच्या अनुभवांचा,तिथे मिळवलेल्या ज्ञानाचा भारताला उपयोग करुन देण्यासाठी परत येत आहेत.अनेक डॉक्टर्स,बिझनेसमन ह्यांमध्ये सामील आहेत.हे सारं खुपच आशादायक चित्र आहे.खरं पाहिलं तर प्रत्येक माणसात उपजतच कर्तृत्वाची भरारी घेण्यासाठी पंख आहेत,ते पंख छाटायचे की पंख फैलावून नवनव्या यशाचं आकाश कवेत घ्यायचं हे ज्याचं त्याने ठरवावं,शेवटी घरटं कुठे बांधावं हा निर्णय ज्याचा त्याने घ्यायचा असतो,नाही का ?

- स्वप्ना कोल्हे ( नाशिक )
संपादक

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास ‘नेटाक्षरी’ जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ५०००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे.’
हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लाभावा हीच इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

ई साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामुल्य ई साप्ताहिके –
स्वरनेटाक्षरी ऑडिओ अल्बम , हास्य नेटाक्षरी , बाल नेटाक्षरी
आणि
प्रसिध्द झालेली ई बुक्स –
टल्लीची शाळा,मकरंदच्या त्रिवेण्या,ग्रेव्हयार्ड लिटरेचर,चार क्षण,तो आणि ती, प्रियेचे अभंग,देशी दारुचे दुकान-3D

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी.. netaksharee@gmail.com